**डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेच्या २०० प्रशिक्षणार्थी क्षमतेच्या सुसज्ज वसतिगृहाच्या बांधकामासाठी एकूण रु.१४, १४, ८९,०००/- एवढ्या रकमेच्या प्रस्तावास <u>प्रशासकीय मान्यता देण्याबाबत</u>**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : विप्रप्र-२०१५/१९५/प्र.क्र.३४/१५/१२-अ,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०१५

**संदर्भ :-** डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेचे पत्र क्र.विप्रविप्रप्र/वसतिबां/२७८/२०१५, दि.११.२.२०१५ चे पत्र.

<u>प्रस्तावना :-</u>

डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या विभागातील “ब“ व “क”वर्गाच्या अधिकारी/कर्मचाऱ्यांची पायाभूत, उजळणी तसेच पदोन्नतीनंतरची प्रशिक्षणे, याशिवाय विविध विभागाच्या गरजानुरुप प्रशिक्षणे प्रबोधिनीत आयोजित करण्यात येतात. तसेच, महाराष्ट्रातील विविध विभागातील गट “अ”, “ब” व “क” च्या कर्मचाऱ्यांचे प्रशिक्षण प्रबोधीनीत यापूर्वी आयोजित करण्यात आले आहे. या व्यतिरिक्त व्यवस्थापन, विशिष्ट विषयांची तोंड ओळख, ई-गव्हर्नन्स, राष्ट्रीय तसेच आंतरराष्ट्रीय स्तरावरील प्रशिक्षणसत्रे इत्यादी बाबींची प्रशिक्षणे प्रबोधिनीत आयोजित करण्याचे प्रस्तावित आहे. या सर्व बाबींचा एकत्रित विचार करता प्रशिक्षण सत्रात मोठया प्रमाणावर वाढ होत आहे. वाढत्या सत्रांचा विचार करता प्रबोधिनीत त्या अनुषंगाने पायाभूत सुविधा निर्माण होणे गरजेचे आहे. ही प्रशिक्षण क्षेत्रातील शासनाची प्रशिक्षण व पूरक सेवा पुरविणारी स्वायत्त संस्था असून या संस्थेची रचना व कार्य यशदा, पुणे च्या धर्तीवर अपेक्षित आहे.

त्या अनुषंगाने उपरोक्त बाबी नमूद करुन, विदर्भ प्रबोधिनी, अमरावती, या संस्थेच्या परिसरामध्ये २०० प्रशिक्षणार्थी क्षमतेचे सुसज्ज वसतिगृहाचे बांधकाम करण्यासाठी रु. १८,६८,०३, ५००/- (रुपये अठरा कोटी, अडुसष्ठ लाख, तीन हजार, पाचशे फक्त) इतक्या रकमेची अधिक्षक अभियंता, सा.बां.(विद्युत) अमरावती, उपविभागीय अभियंता, सा.बां. अमरावती व कार्यकारी अभियंता, अमरावती यांनी तयार केलेल्या व मुख्य अभियंता, सा.बां.वि.अमरावती यांनी साक्षांकित केलेल्या प्राथमिक स्वरुपाच्या अंदाजपत्रकानुसार प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

२. प्रस्तुत कामाचे अंदाजपत्रक मंत्रालयीन सार्वजनिक बांधकाम विभागाने तपासले असून, त्यांनी प्रस्तुत कामाच्या अंदाजपत्रकाची एकूण **रु.१४,१४,८९,०००/- (रुपये चौदा कोटी, चौदा लाख, एकोनव्वद हजार फक्त)** इतकी रक्कम बाबनिहाय निश्चित केली आहे. सदरहू किंमत निश्चित करताना सार्वजनिक बांधकाम विभागाकडून खालील बाबी नमूद करण्यात आल्या आहेत.

१. सदर इमारत तळ अधिक ३ मजले असून इमारतीचे एकूण बांधकाम क्षेत्रफळ ५३९५.२६ चौ. मी. इतके आहे.

२. सदर कामाचे अंदाजपत्रक शासकीय वास्तुशास्त्रज्ञ, यांनी तयार केलेल्या नकाशे व आराखडयावर आधारित आहे.

३. सदर कामाचा सरासरी बांधकाम दर रु.१९,०२९/- प्रति चौ.मी. असा आहे.

४. सदर अंदाजपत्रक उपविभागीय अभियंता, सा.बां.उपविभाग, अमरावती यांनी तयार केले आहे व सक्षम अधिकारी म्हणून कार्यकारी अभियंता, सा.बा.विभाग, अमरावती, अधिक्षक अभियंता, सा.बा.मंडळ, अमरावती तसेच, मुख्य अभियंता, सा.बां. प्रादेशिक विभाग अमरावती यांनी व विशेष कार्य अधिकारी, डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती यांनी साक्षांकित केले आहे.

५. सदर अंदाजपत्रक सन २०१३-१४ च्या दरसूचीवर आधारित आहे. अंदाजपत्रकात इमारतीतील रेन वॉटर हार्वेस्टिंग, बाहय विद्युत पुरवठा, लिफ्ट, ए.सी., अग्निशमन यंत्रणा, वॉटर मेन स्टोरेज, पंपहाऊस, बोअर वेल, सोलर एनर्जी सिस्टिम इत्यांदिंची तरतूद ढोबळ स्वरुपात करण्यात आली आहे. सदरील कामास उपभोक्ता खात्याची सहमती गृहीत धरण्यात येत आहे. तसेच सदरील अतिरिक्त बाबीच्या किंमती या ढोबळ स्वरुपात असून त्याबाबतची प्राथमिकता उपभोक्ता खात्याने त्यांचे स्तरावर ठरवावी. कामाची निकड लक्षात घेता सदरील बाबी ढोबळ स्वरुपात केल्याप्रमाणे ठेवण्यात येत आहेत.

६. अंदाजपत्रकात सचिव समितीच्या निकषाप्रमाणे ४ टक्के आकस्मिक खर्च, ५ टक्के बाह्य पाणीपुरवठा व मलनि:सारण खर्च व ५ टक्के अंतर्गत विद्युतीकरण, इ. तरतूद योग्य करण्यात येत आहे.

३. सदरील काम अर्थसंकल्पाव्यतिरिक्त करावयाचे झाल्यास त्यात ४ टक्के, सेंटेज चार्जेसची तरतूद मिळविण्यात यावी.

(अ) सदर कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यापुर्वी सचिव समितीची मान्याता घेण्यात यावी.

(ब) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

(क) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करुनच काम हाती घ्यावे.

(ड) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३ /प्रक्र.१७७/तां.क.१ दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

वरीलप्रमाणे आवश्यक सुधारणा व दुरुस्त्या करुन व परिच्छेद क्र.३ (अ), (ब) (क) व ( ड) मधील अटींच्या अधिन राहून सार्वजनिक बांधकाम विभागाने प्रस्तुत कामासाठी एकूण **रु.१४,१४,८९,०००/-(रुपये चौदा कोटी, चौदा लाख, एकोण्णनव्वद हजार फक्त)** इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे. सदर प्रस्तावास सचिव समितीची चक्रीय पध्दतीने मान्यता देण्यात आली आहे.

**शासन निर्णय :-**

डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेच्या २०० प्रशिक्षणार्थी क्षमतेच्या सुसज्ज वसतिगृहाचे बांधकाम करण्यासाठी एकूण **रु.१४,१४,८९,०००/-(रुपये चौदा कोटी, चौदा लाख, एकोण्णनव्वद हजार फक्त)** इतक्या रकमेच्या प्रस्तावास सार्वजनिक बांधकाम विभागाने प्रस्तावनेत नमूद

केलेल्या अटी व शर्तींच्या राहून, तसेच, वित्त विभागाच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग पाच, अनुक्र.१, परिच्छेद क्र.१३४ नुसार प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या वित्तिय शक्तीचा वापर करुन व सदर अधिकारातील रकाना क्र.६ खालील अटींच्या अधीन राहून प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करुन, **याद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.**

२. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.ए-४, मुख्य लेखाशीर्ष "२०७०-इतर प्रशासनिक सेवा-००३ प्रशिक्षण-राज्य योजनांतर्गत योजना (००) (०५) डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेस सहायक अनुदान (२०७० ०६८४)-३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली २०१४-२०१५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग व नियोजन विभाग यांच्या मान्यतेने व अनुक्रमे अनौ.संदर्भ क्र.१३६/इमा-३, दि.१०.३.२०१५, संदर्भ क्र.११/इमा-१ दि.२५.३.२०१५ व संदर्भ क्र.११२/का.१४४३, दि.३०.३.२०१५ च्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१५०३३१२१५६०७०००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Santosh Haridas Bhogle

Digitally signed by Santosh Haridas Bhogle
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Santosh Haridas Bhogle
Date: 2015.03.31 22:26:22 +05'30'

**( डॉ. संतोष भोगले )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,
३) मा. अ.मु. स. (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
४) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती
५) विशेष कार्य अधिकारी, डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती
६) उप संचालक, लेखा व कोषागारे, अमरावती
७) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
८) सार्वजनिक बांधकाम विभाग, कार्यासन, इमारती-३ इमारती-१, मंत्रालय, मुंबई
९) नियोजन विभाग, कार्यासन-१४४३, मंत्रालय, मुंबई
१०) वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई
११) अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्रमांक-२५. मंत्रालय, मुंबई
१२ )निवड नस्ती. (सामान्य प्रशासन विभाग/कार्या. १२ अ)